दिनांक २६/११/२००८ रोजी मुंबईत झालेल्या अतिरेकी हल्ल्याच्या घटनेची चौकशी करण्याकरिता नेमण्यात आलेल्या द्विसदस्यीय उच्चस्तरीय समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक एमआयएस-०६०९/प्र.क्र.३४६/भाग-३/वि.शा.१(ब)
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक - १४ जुलै, २००९.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - रासुका-२००८/प्र.क्र.३४/२९-३, दि. ३०/१२/२००८.

**शासन निर्णय :-**

मुंबईत दिनांक २६/११/२००८ रोजी झालेल्या अतिरेकी हल्ल्याची चौकशी करण्याकरिता व ती हाताळताना काही बाबींमध्ये त्रुटी राहिल्या असल्यास त्याची पडताळणी करण्याकरिता संदर्भामध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये, श्री. आर. डी. प्रधान, माजी राज्यपाल, अरुणाचल प्रदेश तथा माजी गृह सचिव, भारत सरकार यांच्या अध्यक्षतेखाली एक द्विसदस्यीय उच्चस्तरीय समिती नेमण्यात आली होती. या समितीने आपला अहवाल दि.२७/५/२००९ रोजी शासनास सादर केला. समितीने आपल्या अहवालात केलेल्या शिफारशींबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबतचा अहवाल ( Action to be taken report ) विधी मंडळाच्या दोन्ही सभागृहात सादर करण्यात आला आहे. समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत निर्णय घेण्याच्या दृष्टिने शासनास अहवाल सादर करण्याकरिता खालीलप्रमाणे **उच्चस्तरीय समिती** स्थापन करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | मुख्य सचिव | -- | अध्यक्ष |
| (२) | अपर मुख्य सचिव (गृह) | -- | सदस्य |
| (३) | प्रधान सचिव (वित्त) | -- | सदस्य |
| (४) | प्रधान सचिव (नियोजन) | -- | सदस्य |
| (५) | महासंचालक व पोलीस महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, मुंबई | -- | सदस्य |
| (६) | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | -- | सदस्य |
| (७) | श्री. सु.ज.महाजन, सह सचिव, गृह विभाग | -- | सचिव |

२.                    सदर समितीस आवश्यकतेनुसार अन्य अधिका-यांना व व्यक्तिंना निमंत्रित म्हणून बोलाविण्याचा अधिकार राहील.

३.                    समिती आपला अहवाल दि. ३० सप्टेंबर, २००९ पर्यंत शासनास सादर करील.

४.                    हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०७१४१८४१०६०००१ आहे.

मा. राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ. शा. धार्गे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव, राज भवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे), यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिवांचे सचिव,
प्रधान सचिव (वित्त),
प्रधान सचिव (नियोजन),
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
श्री. सु. ज. महाजन, सह सचिव, गृह विभाग,
सह सचिव (विधी), गृह विभाग.
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
प्रधान सचिव (अ. व सु.) यांच्या स्वीय सहायक.
निवडनस्ती [कार्यासन विशेष शाखा-१(ब) ]

------------